महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या योजना राबविण्यासाठी, तसेच आस्थापनेवरील खर्च भागविण्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडणेबाबत .

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. पंसाअ-२०१८/प्र.क्र.३०६/का-५**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक:१३.०२.२०१९

**वाचा:-**

१. शासन निर्णय, अ.वि.वि.,क्र.पंसाअ२०१७/प्र.क्र.१७६/का-४, दि.०५.१०.२०१८.
२. वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ सदर्भ ३११/२०१८/व्यय-१, दि.०५.०१.२०१९.
३. महालेखाकार यांचे कार्यालय-१,महाराष्ट्र, मुंबई यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि./ चा-१/अल्पसंख्याक विकास विभाग/यूओआर-१६६/२०१८-१९/१०७३, दि.२४.०१.२०१९.

**प्रस्तावना:-**

राज्यामध्ये पंजाबी भाषेचा विकास, भाषेचे संवर्धन, प्रगती तसेच पंजाबी व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होवून राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी, या उद्देशाने उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या आस्थापनेकरिता ४ पदांसाठी प्रचलित वेतनश्रेणीनुसार वेतनासाठी रु.११,८०,०००/- तसेच कार्यालयीन खर्चासाठी रु.५,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यास, तसेच महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीतर्फे विविध योजना राबविण्यासाठी ३१, सहायक अनुदाने या शीर्षाखाली रु.३०,००,०००/- इतकी अर्थसंकल्पीय तरतूद करण्यास शासनाने मान्यता दिलेली आहे. त्यासाठी नवीन लेखाशीर्ष उघडण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय:-**

महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या आस्थापनेवरील तसेच सदर अकादमीतर्फे विविध योजना राबविण्यासाठी खालीलप्रमाणे दोन नवीन लेखाशीर्ष उघण्यास मान्यता देण्यात येत आहे:-

| | |
|---|---|
| मागणी क्र. झेड ई-१<br>२२०५- कला व संस्कृती<br>१०२- कला व संस्कृती प्रचालन<br>(००) (०२)- महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीची आस्थापना (अनिवार्य)<br>(२२०५३५९१) | Grant No.ZE-1<br>2205- Art and Culture<br>102- Promotion of Arts and Culture<br>(00)(02)-Establishment of Maharashtra State Punjabi Sahitya Academy (Committed)<br>(22053591) |
| मागणी क्र. झेड ई-१<br>२२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण<br>०२- समाज कल्याण<br>१९९- इतर अशासकीय संस्थांना सहाय्य<br>०१- अल्पसंख्याक सहाय्य<br>(०१)(०२)- महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम)<br>(२२३५ सी २१४) | Grant No.ZE-1<br>2235-Social Security and Welfare<br>02- Social Welfare<br>199- Assistance to Other Non-Government Institution<br>01- Assistance to Minorities<br>(01)(02)-Grant-in-Aid for Various Schemes of Maharashtra State Punjabi Sahitya Academy (Scheme) (2235 C 214) |

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.अनौ सदर्भ ३११/२०१८/ व्यय-१, दि.०५.०१.२०१९ महालेखाकार यांचे कार्यालय-१,महाराष्ट्र, मुंबई यांचा अनौपचारिक संदर्भ क्र.ख.वि./चा-१/अल्पसंख्याक विकास विभाग/यूओआर-१६६/२०१८-१९/१०७३, दि.२४.०१.२०१९ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेताक २०१९०२१३१११०३७४२१४ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Mahesh Sadashiv Choukekar
Date: 2019.02.13 11:36:25 +05'30'

**(म. स. चौकेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत:-**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव,
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
३. मा. मंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,

४. मा. मंत्री (वित्त व नियोजन) यांचे खाजगी सचिव,
५. मा. राज्यमंत्री (अ.वि.) यांचे खाजगी सचिव,
६. मा. मुख्य सचिव, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक,
७. महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
८. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई,
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई,
१०.अवर सचिव (व्यय-१/ अर्थ-१४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (१४७१), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव (का-७), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई,
१३. अधिक्षक-नि-कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य पंजाबी साहित्य अकादमी,
१४. निवडनस्ती (का-५)